केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत कार्यक्रमांसाठी अनुसुचित जाती प्रवर्गाकरीता (SCSP) सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामधील केंद्र हिश्श्यापोटी लेखाशिर्ष २२१०G५९२ अंतर्गत रु.५०६१.०० लक्ष व राज्य हिश्श्यापोटी लेखाशिर्ष २२१०G६०९ अंतर्गत रु. ३३७४.०० लक्ष असे एकूण रू.८४३५.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बियुडी-१३२४/प्र.क्र.२१८/आरोग्य-७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १९ जुलै, २०२४

**वाचा :-**

१) केंद्र शासनाचे मंजूरी आदेश क्र. G.२७०१७/२१/२०२४-२५/NHM- Finance/ FTS-८२७२७२४ दिनांक १९.०६.२०२४
२) केंद्र शासनाचे पत्र क्र. D.O. F.No.१ (१३). PFMS/२०२० NHM Finance दिनांक १६/०२/२०२३
३) वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-१०१८/प्र.क्र.४६/अर्थोपाय, दिनांक ०५/१२/२०२३
४) वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-१०१८/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०८/१२/२०२३
५) वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ दिनांक ०१/०४/२०२३
६) संचालक (वित्त व लेखा ) यांच्या प्रस्ताव क्र.राआसोम/एफएमजी/ के.रा. हि/२३१२३-१२९/२०२४-२५, दिनांक २४.०६.२०२४
७) शासन निर्णय क्र.बिजीटी-२०२४/प्र.क्र.३९/अर्थसंकल्प (विघयो), दिनांक १९/०७/२०२४

**प्रस्तावना :-**

ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह, सर्व प्रकारच्या गरजूंना आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले. सन २०१४-१५ मध्ये केंद्र शासनाने आरोग्य विषयक सर्व केंद्र पुरस्कृत योजना एकत्रित करुन त्यास "राष्ट्रीय आरोग्य अभियान" असे नाव दिले. या राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आता राष्ट्रीय आरोग्य अभियान, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान व राष्ट्रीय रोग नियंत्रण कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत योजनांचा समावेश केला आहे. राष्ट्रीय ग्रामीण

आरोग्य अभियानाकरीता अनुसुचित जाती प्रवर्गाकरीता (SCSP) निधी सन २०२४-२५ च्या मंजूर अर्थसंकल्पीत तरतुदीतून केंद्र व राज्य हिस्सा राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. प्रस्तुत प्रकरणी आता पर्यंत वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाचा तपशील पुढील प्रमाणे आहे. :-

**(रु. लाखात)**

| अ.क्र. | तपशील | केंद्र | राज्य |
|---|---|---|---|
| | | २२१०G५९२ | २२१०G६०९ |
| १. | अर्थसंकल्पीय तरतुद (मुळ) | १६०२१.४४ | १६०००.५० |
| A | एकुण उपलब्ध तरतूद | १६०२१.४४ | १६०००.५० |
| B | शासननिर्णयाद्वारे वितरीत तरतूद | | |
| १ | बियुडी-१३२३/प्र.क्र.२७२/आरोग्य-७ दि.१६.०५.२०२४ | | २४१.२६ |
| २ | बियुडी-१३२३/प्र.क्र.२७२/आरोग्य-७ दि.१६.०५.२०२४ | ४९८९.०० | ३३२६.०० |
| C | शिल्लक निधी (A-B) | ११०३२.४४ | १२४३३.२४ |

**शासन निर्णय :-**

उपरोक्त विवरणपत्रात नमूद केल्यानुसार राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियाना करीता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी अनुसुचित जाती प्रवर्गाकरीता (SCSP) वर्गवारी साठी उपलब्ध करुन दिलेल्या केंद्र हिस्सा २२१०G५९२ या लेखाशिर्षातंर्गत रु.५०६१.०० लक्ष तसेच सदर रक्कमेच्या समरुप राज्य हिश्श्यापोटी २२१०G६०९ या लेखाशिर्षातंर्गत अनुसुचित जाती प्रवर्गाचा ४० टक्के राज्य हिश्श्याचा रु.३३७४.०० लक्ष इतका असा एकुण रु.८४३५.०० लक्ष इतका निधी सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पीय अंदाजातील शिल्लक तरतुदीतुन राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च केंद्र लेखाशिर्ष २२१०G५९२ व राज्य लेखाशिर्ष २२१०G६०९ अंतर्गत सन २०२४-२५ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा.

०३. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटीच्या यांच्याकडे

सूपुर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर प्रस्तावावरील खर्च खालील प्रमाणे नमुद लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२४-२५ साठी मंजुर करण्यात आलेल्या उपलब्ध तरतुदीतुन भागविण्यात यावा.

(रु. लाखात)

| अ.क्र. | तपशील | मुळ अर्थसंकल्पीय तरतुद (२०२४-२५) | मागणी रक्कम (केंद्र ६०% व राज्य ४०% हिस्सा ) |
|---|---|---|---|
| १ | एन-३, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६, सार्वजनिक आरोग्य, ७८९, अनुसूचित जाती उपयोजना,<br>(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०५) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान (केंद्र हिस्सा ६० %) (कार्यक्रम)<br>३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१०G५९२) | १६०२१.४४ | ५०६१.०० |
| २ | एन-३, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६, सार्वजनिक आरोग्य, ७८९, अनुसूचित जाती उपयोजना,<br>(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०६) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान (राज्य हिस्सा ४० %) (कार्यक्रम)<br>३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१०G६०९) | १६०००.५० | ३३७४.०० |

०५. वित्त विभागाच्या दिनांक ०१ एप्रिल, २०२४ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.८ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक ०१/०४/२०२४ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

०६. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखा परिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप नसल्याचे राज्य आरोग्य सोसायटीने प्रमाणित केलेले आहे.

०७. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या/लाभार्थ्याच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

०८. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ०१ एप्रिल, २०२४ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तीचे पालन करुन त्या संदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबीं स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहून निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरण करण्यात येत आहे.

०९. सदर अनुदान सशर्त असून या पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

१०. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ व दिनांक १४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे/ अटी व शर्तीचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात योणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

११. सदर प्रस्तावावरील निधीच्या विनियोगाच्या अनुषंगाने आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीच्या संदर्भांत शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकारी यांची प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

१२. सदरचा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक मुंविनि/-२०२२/प्र.क्र.-२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून तसेच वित्त विभागाच्या दि.०८.१२.२०२३ रोजीच्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१३. प्रस्तुत शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या शासन निर्णय क्र.बिजीटी-२०२४/प्र.क्र.३९/अर्थसंकल्प (विघयो), दिनांक १९/०७/२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

१४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१८१५१४३५०४१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AVINASH SARDAR JADHAV

Digitally signed by AVINASH SARDAR JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=77e749a5820964d03e94305adeb0ee2ffb2c5f02efc5b019e8b49dc59175a25c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AA8FDCAA7AE61AB4BED501E19D794BD7197874F2989B98780B1607ADCBDFE844, cn=AVINASH SARDAR JADHAV
Date: 2024.07.19 17:22:41 +05'30'

**(अ.स.जाधव)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
७. सहाय्यक संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
८. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग(अर्थसंकल्प/विघयो), मंत्रालय, मुंबई.
१२. वित्त विभाग (व्यय-१४/ अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१३.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१३. निवडनस्ती (आरोग्य-७) .